**सन २०२३-२४ च्या टंचाई कालावधीत ग्रामीण तसेच नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत. (लेखाशीर्ष २२४५ ००९३)**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०२४/प्र.क्र. ३७/पापु-१४

गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीखः ३१ मार्च, २०२५

**वाचा :-**

१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र.१२/पापु-१४, दि. ३ फेब्रुवारी, १९९९.
२) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २००८/प्र.क्र.१४९/पापु-१४, दि. २१ ऑगस्ट, २००९
३) शासन परिपत्रक, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र.१९१/पापु-१४, दि. २७ नोव्हेंबर, २०१८
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.एससीवाय-२०२४/प्र.क्र.३७/म-७, दि. ३१ ऑक्टोबर, २०२३ ,
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक: एससीवाय-२०२४/प्र.क्र.३७/म-७, दि. १४ ऑगस्ट , २०२४
६) ज्ञापन, महसूल व वन विभाग क्र.एससीवाय-०८/२०२४/प्र.क.६३/म-१, दि.२५.१०.२०२४
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.जिपपु/ग्रापापु/टंचाई/३२/२५, दि. २२.०१.२०२५
८) जिल्हाधिकारी, धाराशिव यांचे पत्र क्र. जा.क्र.२०२३/नपप्र/कार्या-१/पाणी टंचाई/कावी-२५, दि. २७.०१.२०२५

**प्रस्तावना :-**

राज्यातील ग्रामीण व नागरी भागातील पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या उपाययोजनांवरील खर्च “२२४५-नैसर्गिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य” या लेखाशीर्षाखाली महसूल व वन विभागाकडून उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात येतो. सन २०२३-२४ च्या टंचाई कालावधीत केलेल्या उपायोजनांसाठी निधी मागणीचे प्रस्ताव या विभागास प्राप्त झाले आहेत. सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरिता महसूल व वन (मदत व पुनर्वसन) विभागाने त्यांच्या वाचा येथील क्रमांक ४,५ व ६ अन्वये या विभागाकडे वितरीत केलेल्या निधीमधून जिल्हा परिषद, तसेच जिल्हाधिकारी कार्यालय यांनी मागणी केलेल्या तसेच शासन स्तरावरुन मान्यता देण्यात आलेल्या उपाययोजनांसाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

ग्रामीण / नागरी भागात पेयजल टंचाई निवारणार्थ शासनाने विहीत केलेल्या निकषानुसार विभागीय आयुक्त, पुणे व संभाजीनगर यांना त्यांच्या विभागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ राबविलेल्या/राबविण्यात येणाऱ्या उपाययोजनांवरील खर्च लेखाशिर्ष २२४५ ००९३ **अंतर्गत रुपये ९७१.७५ लाख (अक्षरी रुपये नऊ कोटी, एक्काहत्तर लाख, पंच्याहत्तर हजार रुपये फक्त)** इतका निधी विभागीय आयुक्त, पुणे व संभाजीनगर यांना जिल्हा परिषदांकडून तसेच जिल्हाधिकारी कार्यालयाकडून प्राप्त विवरणपत्र "अ" च्या अनुषंगाने प्रचलित स्थायी शासन निर्णयांमध्ये (संदर्भाधीन अ. क्र. १ ते ५ ) विहीत केलेल्या अटी व शर्ती तसेच खालील अटींच्या अधीन राहून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

**अटी व शर्ती**

१) विभागीय आयुक्त, पुणे व संभाजीनगर यांनी ग्रामीण भागातील टंचाई अंतर्गत उपाययोजनांसाठीचा निधी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना एका आठवड्याच्या आत थेट वितरीत करण्यात यावा.

२) ज्या नागरी उपाययोजना महानगरपालिका/नगरपरिषद यांचे मार्फत राबविण्यात येत आहे. त्याकरिता विभागीय आयुक्त यांनी संबंधित जिल्हाधिकारी यांना वितरीत करावा. जिल्हाधिकारी यांनी सदर निधी संबंधित आयुक्त, महानगरपालिका/मुख्याधिकारी, नगरपरिषद यांना वितरीत करावा.

३) सन २०२३-२४ या टंचाई कालावधीसाठी ग्रामीण/नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांकरीता तसेच या कालावधीतील प्रलंबित देयकांच्या प्रदानासाठी सदर निधी वितरीत करण्यात यावा. अन्य टंचाई कालावधीतील उपाययोजनांसाठी सदर निधी खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

४) विभागीय आयुक्त यांनी सदरचा निधी महसुल व वन विभागाच्या निर्देशान्वये खरीप हंगाम २०२३ करीता राज्यातील दुष्काळ घोषीत केलेल्या १५ जिल्ह्यांतील ४० तालूक्यांमध्ये टंचाई अंतर्गत घेण्यात आलेल्या उपाययोजनांसाठी खर्ची टाकण्यात यावा. तथापि झालेल्या कामाच्या प्रमाणात निधी प्राधान्याने वितरीत करण्याची दक्षता घ्यावी.

५) आर्थिक वर्ष सन २०२३-२०२४ मध्ये वितरीत निधीपैकी ज्या प्रमाणात उपयोगिता प्रमाणपत्रे सादर केलेली आहेत. त्या जिल्हयांना तेवढयाच टक्केवारीच्या प्रमाणात निधी वितरीत करण्याची कार्यवाही विभागीय आयुक्त यांच्या स्तरावरुन करण्यात यावी.

६) सदर निधी स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account ) अथवा बँक खात्यात न ठेवता तो कंत्राटदारांना थेट Electronic Clearing Services द्वारे वितरीत केला जाईल याची दक्षता घ्यावी.

७) निधीचे वितरण करतांना यापूर्वी संबधित उपाययोजनेला निधी वितरित करण्यात आलेला नाही याची खातरजमा करावी.

८) ज्या नागरी तथा ग्रामीण उपाययोजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्यात येत आहेत, त्या उपाययोजनांसाठीचा निधी जिल्हा परिषदेकडे वितरीत करण्यात येऊ नये. सदर निधी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी योजना राबविणाऱ्या संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचेकडे तात्काळ वितरीत करावा. तसेच ज्या उपाययोजना महानगरपालिका / नगरपरिषद यांचे मार्फत राबविण्यात येत आहेत, त्याचेकरिता जिल्हाधिकाऱ्यांनी सदर निधी संबंधित आयुक्त, महानगरपालिका / मुख्याधिकारी, नगरपरिषद यांचेकडे वितरीत करावा.

९) यापुढे टंचाई निवारणार्थ घ्यावयाच्या उपाययोजनांकरिता निधीची मागणी करतांना, टंचाई निवारणार्थ कोणत्या प्रस्तावित उपाययोजना कोणत्या कालावधीसाठी घ्यावयाच्या आहेत, त्यासाठी किती निधीची आवश्यकता आहे याबाबत बाब निहाय मागणी तसेच चालू आर्थिक वर्षात वितरीत करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादि बाबतची माहिती, तसेच त्याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावीत. त्याशिवाय भविष्यात निधी मंजूर केला जाणार याची नोंद घेण्यात यावी.

१०) सदर शासन निर्णयानुसार टँकरद्वारे/पिण्याच्या पाणी पुरवठा करण्यासाठीच्या उपाययोजनांकरीता जो निधी वितरीत करण्यात आला आहे, त्यामधून देयके अदा करताना खाजगी टँकरवर जी.पी.एस. प्रणाली बसविलेली असेल व जी.पी.एस.प्रणालीवर ज्या टँकरच्या फेऱ्यांची नोंद होईल त्याच फेऱ्या देयकाकरिता अनुज्ञेय राहतील. पाणी पुरवठा करणाऱ्या ज्या टँकरवर जी.पी.एस.प्रणाली बसविलेली नाही किंवा जी.पी.एस.प्रणाली बंद असल्याकारणाने टँकर वाहतूक धारकाने टँकरच्या फेऱ्या झाल्याचा दावा केला असल्यास, अशा फेऱ्या अनुज्ञेय ठरणार नाहीत. तसेच जी.पी.एस. प्रणालीची नोंद होत नाहीत अशी देयके प्रमाणित करण्यात येऊ नये व अशा प्रकारे प्रमाणित केलेल्या देयकांसाठी निधी वितरीत करण्यात येऊ नये.

११) ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे, त्याबाबतची जिल्हानिहाय भौतिक प्रगतीची माहिती विभागीय आयुक्तांनी शासनाकडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपद्धतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणाऱ्या प्रत्यक्ष खर्चाची माहिती पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत एकत्रितरित्या शासनास सादर करावी. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे विहीत प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच **कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही** याची दक्षता नियंत्रक अधिकाऱ्याने घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहीत वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

१२) सदर निधी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातच खर्च होणे आवश्यक आहे. तो व्यपगत होणार नाही अथवा कोषागारातून आहरित करून बँक खात्यात काढून ठेवला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

१३) **याबाबतचा खर्च या शासन निर्णयातील निधी वितरण बाबतच्या विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे "मागणी क्र. सी-६, २२४५ -नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१, अवर्षण, १०२, पिण्याच्या पाण्याचा पुरवठा; (९१)-राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (अनिवार्य); ३१, सहायक अनुदाने वेतनेत्तर- (२२४५ ००९३)" या** लेखाशीर्षा**खाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

१४) आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार / उप कोषागार अधिकारी यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या व देयकासोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक स्लीपमध्ये गौण / उपलेखाशीर्षाचा संगणक संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा. तसेच, कोषागारातून/ उपकोषागारातून आहरीत केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

१५) संबंधित जिल्हाधिकारी यांनी एक महिन्याच्या आत या खर्चाबाबत प्रमाणीत /उपयोगीता प्रमाणपत्रे शासनास सादर करावीत. त्यानंतरच पुढील निधी वितरीत केला जाईल.

या शासन निर्णयान्वये करण्यात येणाऱ्या निधी वितरणाचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

(रक्कम रु.लाखात)

| अ.क्र. | विभाग | जिल्हा | विवरणपत्र "अ"नुसार प्रलंबित मागणी (रु. लाख) |
|---|---|---|---|
| १. | पुणे | पुणे | ९०५.०० |
| २. | छत्रपती संभाजीनगर | धाराशिव (नगरपंचायत, लोहारा) | ६६.७५ |
| एकूण | | | ९७१.७५ |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३३११३२५५६३२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA GORAKH BHARATE

Digitally signed by RAVINDRA GORAKH BHARATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=96ee74617e9bb0cdcfad343ca5dc2e158423ad4dd919bcae9a0b9fc9b413b60b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD232EB47EB633CB760C7BD2ACF421B01B1DA040DC965254760018B5F4E33BE5, cn=RAVINDRA GORAKH BHARATE
Date: 2025.03.31 18:46:32 +05'30'

**( रविंद्र भराटे )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सचिव, महसूल (मदत व पुनर्वसन) विभाग, मंत्रालय मुंबई.
५. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
६. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
७. विभागीय आयुक्त, पुणे, छत्रपती संभाजीनगर
८. जिल्हाधिकारी (धाराशिव,पुणे )
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ,पुणे
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी (पुणे, धाराशिव)
१२.कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद ,पुणे
१३. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव
१४. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव
१५. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१६. उप सचिव / पापु-१४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक
१७. पापु-१४ संग्रहासाठी.